**सन २०१०-२०११ या शैक्षणिक वर्षापासून +२ स्तरावरील द्विलक्षी अभ्यासक्रमाच्या नवीन/ अधिकच्या तुकडयांना कायमस्वरूपी विनाअनुदान तत्वावर सुरू करण्यांस मान्यता देणेबाबत....**

महाराष्ट्र शासन

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**

शासन निर्णय क्रमांक व्हीओसी २०१०/५९८/प्र.क्र.१८०/व्यशि-४,

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२

दिनांक : ४ ऑगस्ट, २०१०

**संदर्भ** : प्रभारी संचालक (व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक ८/व्हीओसी/१०२०१०/ ३५९ दिनांक १३.७.२०१०.

**प्रस्तावना :-** डॉ. कोठारी आयोगाच्या १९६४ च्या शिफारशीनुसार अधिकाधिक युवकांना विविध व्यवसायांचे प्रशिक्षण देण्याच्या दृष्टीने १९७८-७९ पासून राज्यात व्यवसाय विषयांची ३०% व्याप्ती असलेले, +२ स्तरावरील द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम सुरू करण्यांत आले. सद्यस्थितीत तांत्रिक/वाणिज्य/कृषी/मत्स्य या गटातील एकुण १६ द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम राज्यातील ४९ शासकीय, १२९ अशासकीय अनुदानित व १२५५ अशासकीय विना अनुदानित संस्थामध्ये राबविण्यांत येत आहे. सदर अभ्यासक्रम घेणा-या विद्यार्थ्यांना अभियांत्रिकी शाखेमध्ये प्रवेशाच्या चांगल्या संधी उपलब्ध आहेत. त्याच बरोबर अभियांत्रिकी विद्या शाखे मधील पदविकेच्या (Diploma) व्दितीय वर्षामध्ये प्रवेशाची सुविधा उपलब्ध असल्यामुळे या अभ्यासक्रमाकडे विद्यार्थ्यांचा मोठा प्रतिसाद आहे. सदर व्यवसाय अभ्यासक्रमांची वाढती मागणी लक्षात घेता शैक्षणिक वर्ष २०१०-२०११ पासून +२ स्तरावरील द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमाच्या अधिकच्या/नविन तुकडया कायमस्वरुपी विना अनुदानित तत्वावर सुरू करण्याकरीता इच्छूक संस्थांनी अर्ज करण्या संबंधी संचालक व्यवसाय शिक्षण यांनी जाहीरात विज्ञापित केली होती त्यानुसार संचालक व्यवसाय शिक्षण यांच्याकडे एकूण ५६ संस्थांकडून अर्ज प्राप्त झाले होते. त्यानुसार संस्थाकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांची संचालनालय स्तरावर छाननी करण्यांत आली. तपासणीअंती विहित अटी व शर्तींची पूर्तता केलेल्या ४९ अशासकीय संस्थांमध्ये +२ स्तरावरील व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमाच्या एकूण ६१ नवीन/अधिकच्या तुकड्या कायम विनाअनुदानित तत्त्वावर सुरु करण्यास मान्यता देण्याची शिफारस संचालनालयाच्या वरील संदर्भाधिन पत्रान्वये शासनास प्राप्त झाली आहे. या संस्थांना +२ स्तरावरील व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमाच्या नवीन/अधिकच्या तुकडया कायम विनाअनुदानित तत्वावर शैक्षणिक वर्ष २०१०-११ पासून सुरु करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** राज्यातील व्यवसाय अभ्यासक्रम राबविणा-या एकूण ४९ अशासकीय संस्थांमध्ये +२ स्तरावरील द्विलक्षी अभ्यासक्रमाच्या एकूण ६१ अधिकच्या/नविन तुकडया **कायमस्वरूपी विनाअनुदानित तत्वावर** शैक्षणिक वर्ष २०१०-११ पासून सुरू करण्यास खालील अटीं व शर्तींच्या अधिन राहून शासनाची मान्यता देण्यांत येत आहे. (प्रपत्र अ सोबत जोडले आहे.) यामुळे सन २०१०-११ मध्ये +२ स्तरावरील व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमाच्या ३०५० विद्यार्थांना याचा लाभ होणार आहे.

**अटी व शर्ती**

१. सबंधित संस्थेस माध्यमिक शाळा संहिता १९८१ मध्ये नमूद केलेल्या सर्व अटी व शर्तींची पूर्तता करणे बंधनकारक राहील.

२. मान्य अभ्यासक्रमांच्या नविन/अधिकच्या तुकडया सुरू करण्यांस कायमस्वरूपी विनाअनुदानित तत्वावर मान्यता दिली असली तरीही, भविष्यात कोणत्याही प्रकारचे अनुदान अथवा आर्थिक मदत देण्यांत येणार नाही.

३. मान्य अभ्यासक्रम राबविणा-या संस्थांना शासन/संचालनालय/संचालनालयाच्या अखत्यारीतील संबंधित कार्यालये यांच्या कडून वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या आदेशांचे पालन करणे बंधनकारक राहील.

४. शासनाने वेळोवेळी निश्चित केलेले शिक्षण शुल्क विद्यार्थ्यांकडून आकारणे संस्थेस बंधनकारक राहील.

५. **"कायमस्वरूपी विनाअनुदान तत्वावर मान्यता मिळालेले +२ स्तरावरील द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम "** असा सूचना फलक संस्थांनी दर्शनी भागावर लावणे बंधनकारक राहील. सूचना फलकावर अभ्यासक्रमांच्या मंजूर तुकडयांची संख्या व मंजूर प्रवेश क्षमता याचा उल्लेख करण्यात यावा.

६. मान्यतेचे आदेश निर्गमित झाल्यानंतर, संबंधित संस्थेने मंजूर अभ्यासक्रमासाठी मानकानुसार आवश्यक असलेल्या सर्व पायाभूत सुविधा एक महिन्याच्या कालावधीमध्ये उपलब्ध करणे बंधनकारक राहील.

७. सदर अभ्यासक्रमांना कायमस्वरूपी विनाअनुदान तत्वावर मान्यता देण्यांत आल्यामुळे या अभ्यासक्रमाकरीता संस्थेने नियुक्त केलेल्या सर्व कर्मचारी वर्गाची सेवा/वेतन व तदनुषंगिक बाबींची जबाबदारी सर्वस्वी संबंधित संस्थेची राहील. याबाबत शासन कोणतीही जबाबदारी घेणार नाही.

८. मंजूर अभ्यासक्रमांकरीता आवश्यक कर्मचाऱ्यांच्या नियुक्त्या, त्यांची किमान शैक्षणिक अर्हता, अनुभव याबाबत संस्थेने महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ मधील तरतुदींनुसार तसेच शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार कार्यवाही करण्यांत यावी.

९. भविष्यात सदरचे अभ्यासक्रम बंद करण्याबाबत, किंवा त्यात काही बदल करण्याबाबत शासनाने निर्णय घेतल्यास तो विनाअट, विनाविलंब संस्थेने अंमलात आणणे आवश्यक राहील.

१०. अभ्यासक्रमांच्या मंजूर तुकडयांमधील प्रवेशाकरीता, शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले सामाजिक/समांतर आरक्षण व इतर नियमांचे संस्थेने काटेकोरपणे पालन करावे व गुणानुक्रमे प्रवेश देण्यांत यावेत.

११. अभ्यासक्रमांना मंजूरी मिळाल्यानंतर सदर अभ्यासक्रम संस्थेत सुरू केल्याबाबतची माहिती संस्थेने महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक परिक्षा मंडळास तात्काळ द्यावी त्याबाबतची अनुषंगिक कार्यवाही करावी.

१२. मान्यता देण्यांत आलेल्या अभ्यासक्रमाच्या अधिकच्या/नविन तुकडयांची प्रवेश क्षमता प्रती तुकडी ५० असून, शैक्षणिक वर्ष २०१०-२०११ मध्ये मंजूर प्रवेश क्षमतेच्या ५०% पेक्षा कमी प्रवेश झाल्यास अशा तुकडया सुरू ठेवण्याकरीता संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिका-यांची परवानगी घेणे आवश्यक राहील. त्याचप्रमाणे सलग तीन शैक्षणिक वर्षांमध्ये मंजूर प्रवेश क्षमतेच्या ५०% पेक्षा कमी प्रवेश झाल्यास सदर अभ्यासक्रमाची तुकडी बंद करण्याची कार्यवाही करण्यांत येईल.

१३. संबंधित संस्थेने त्यांच्याकडे भाषा / जीवशास्त्र इत्यादी विषयांचे शिक्षक आता मंजूर केलेल्या व्दिलक्षी अभ्यासक्रमाच्या तुकडीमुळे अतिरीक्त ठरणार नाहीत याची खातरजमा करुनच विद्यार्थ्यांना प्रवेश दयावा.

१४. शैक्षणिक गुणवत्ता वाढविण्यासाठी उपरोक्त अटी व शर्तीमध्ये बदल करण्याचे किंवा नवीन अटी व शर्ती अंर्तभूत करण्याचे अधिकार शासनाचे राहतील.

हा शासन निर्णय राज्य शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणकीय सांकेतांक क्र. **२०१००८०४२०२४०७००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

**(शोभा वि. पत्की)**
कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन

प्रत :-

१) प्रभारी संचालक (व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई -१
२) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक, (शालेय शिक्षण विभाग), मुंबई/पुणे/नाशिक/कोल्हापूर/नागपूर/अमरावती/लातूर/औरंगाबाद.
३) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालय, मुंबई /नाशिक/ पुणे/ अमरावती/ औरंगाबाद/ नागपुर
४) संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी
५) संबंधित अशासकीय संस्था (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालया मार्फत.)
६) मा. मंत्री (उ व तंशि) /मा. राज्यमंत्री (उ व तंशि) यांचे खाजगी सचिव यांना माहितीसाठी सादर.
७) निवड नस्ती (व्यशि-४)

| शैक्षणिक वर्ष २०१०-२०११ पासून मान्यता देण्यात येणा-या दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमाचे नांव व तुकडयाची संख्या | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| विभाग | जिल्हा | अ.क्र | संस्थेचे नांव व पत्ता | शैक्षणिक वर्ष २०१०-११ पासून देण्यात येणा-या व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमाचे नांव व तुकडयांची संख्या | |
| | | | | अभ्यासक्रमाचे नांव | मंजूर तुकडयाची संख्या प्रती तुकडी (प्रवेश क्षमता ५० विद्यार्थी) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| मुंबई | मुंबई उपनगर | १ | शारदा एज्युकशेन सोसायटीचे डॉन बॉस्को हायस्कूल व ज्युनिअर कॉलेज, टागोर नगर, विक्रोळी (पू) मुंबई - ४०००८३ | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| | | | | बॅंकिग | १ |
| | | २ | इंडियन एज्युकेशन सोसायटीचे ज्युनियर कॉलेज आर्ट कॉमर्स ॲण्ड सायन्स बांद्रा(पू), मुंबई - ५१ | इलेक्ट्रीकल मेटेनन्स | १ |
| | | | | इलेक्ट्रॉनिक्स | १ |
| | | | | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| | | ३ | पाल राजेद्र एज्युकेशन ट्रस्टचे अल्फा ज्युनियर कॉलेज, सायन्स आणि कॉमर्स, विलेपार्ले, मुंबई - ५७ | इलेक्ट्रॉनिक्स | १ |
| | | ४ | दि. कांदिवली एज्युकेशन सोसायटीचे श्री टी. पी. भाटीया ज्यु. कॉलेज ऑफ सायन्स भुलाभाई देसाई मार्ग, कांदिवली (प.) मुंबई - ६७ | इलेक्ट्रीकल मेटेनन्स | १ |
| | | | | मॅकेनिकल मेन्टेनन्स | १ |
| | | ५ | जोगेश्वरी एज्युकेशन सोसायटीचे ज्यु. कॉलेज ऑफ सायन्स ॲण्ड कॉमर्स, केव्हज रोड, जोगेश्वरी (पू), मुंबई - ६० | बॅंकिग | १ |
| | | | | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| | | ६ | मन्नास वैभव एज्युकेशन ट्रस्टचे रविंद्रभारती हायस्कूल आणि ज्यु. कॉलेज, सिध्दार्थनगर, म्युनिसिपल स्कूल बिल्डिंग सिध्दार्थ नगर, गोरेगाव (प.) मुंबई - १०४ | इलेक्ट्रॉनिक्स | १ |
| | | | | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| | रत्नागिरी | ७ | नवनिर्माण शिक्षण संस्था रत्नागिरी एस. एम. जोशी विद्यानिकेतन, पी-६३, एम. आय. डी. सी. रत्नागिरी ङ ४१५६३९ | कॉम्प्युटर सायन्स | १ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पुणे** | **पुणे** | **८** | पुणे विद्यार्थी गृहाचे , महाराष्ट्र विद्यालय व कनिष्ठ महाविद्यालय, १७८६, सदाशिव पेठ, पुणे, जि. पुणे ४११०३० | इलेक्ट्रॉनिक्स | १ |
| | | **९** | प्रोग्रेसिव्ह एज्युकेशन सोसायटी, पुणे व्दारा संचलित मॉडर्न हायस्कूल व कनिष्ठ महाविद्यालय, से. न. २१, यमुनानगर, निगडी, पुणे, जि. पुणे | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| | | **१०** | जिजामाता शिक्षण प्रसारक मंडळ, सराटी, ता. इंदापूर, जि. पुणे, संचलित जिजामाता माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालय, सराटी, ता. इंदापूर, जि. पुणे | क्रॉपसायन्स | १ |
| | **सातारा** | **११** | श्री. शिवाजी शिक्षण सस्थेचे उच्च शिक्षण मंडळ कराड व्दारा यशवंतराव चव्हाण कॉलेज ऑफ सायन्स, विद्यानगर, कराड, जि. सातारा | जनरल सिव्हील इंजिनियरिंग | १ |
| | | **१२** | औध शिक्षण मंडळ, औंध संचलित राजा भगवंतराव ज्युनियर कॉलेज, औंध, ता. खटाव, जि. सातारा | इलेक्ट्रॉनिक्स | १ |
| | **सांगली** | **१३** | सद्‌गुरु जंगली महाराज शिक्षण संस्था कापुसखेड संचलित सद्‌गुरु माध्यमिक व उच्च माध्यमिक आश्रमशाळा, इस्लामपूर, ता. वाळवा, जि. सांगली | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| | **सोलापूर** | **१४** | ज्ञानेश्वर प्रतिष्ठान संचलित सुयश गुरुकुल ज्युनियर कॉलेज, एस. आर. पी. कॅम्पसमोर, प्रतापनगर, विजापूर रोड, सोलापूर, जि. सोलापूर | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| | | **१५** | श्री. विठ्ठल देवस्थान ट्रस्ट संचलित नुतन माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालय, केम, ता. करमाळा, जि. सोलापूर | क्रॉपसायन्स | १ |
| | | **१६** | श्रीराम शिक्षण संस्था संचलित श्रीराम माध्यमिक विद्यालय व विज्ञान कनिष्ठ महाविद्यालय, पानीव, ता. माळशिरस, जि. सोलापूर ४१३११३ | क्रॉपसायन्स | १ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पुणे** | **सोलापूर** | **१७** | श्री नर्मदेश्वर शिक्षण प्रसारक मंडळ संचलित, तुळशीराम जाधव माध्यमिक व उच्च माध्यमिक प्रशाला, तुळशीदास नगर, वैराग , ता. बार्शी, जि. सोलापूर | क्रॉपसायन्स | १ |
| | | **१८** | सांगोला तालुका शेतकरी शिक्षण प्रसारक मडळ, सांगोला संचलित न्य. इंग्लिश स्कूल व ज्युनियर कॉलेज, सांगोला, जि. सोलापूर | इलेक्ट्रॉनिक्स | १ |
| | **कोल्हापूर** | **१९** | आदर्श गुरुकुल ॲकॅडमी मिणचे, ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर संचलित आदर्श गुरुकुल विद्यालय व ज्यु. कॉलेज (मौजे तासगाव रोड) पेठवडगाव, ता. हातकणगले, जि. कोल्हापूर ४१६०१२ | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| | | **२०** | प्रायव्हेट एज्युकेशन सोसायटी, कोल्हापूर संचलित प्रायव्हेट हायस्कूल व ज्युनियर कॉलेज, २५६० बी वॉर्ड खासबाग, कोल्हापूर, जि. कोल्हापूर ४१६०१२ | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| | | **२१** | श्री दत्त शिक्षण प्रसारक मंडळ, पणुत्रे, ता. पन्हाळा, जि. कोल्हापूर संचलित विठ्ठल पाटील माध्यमिक विद्यालय व ज्युनियर कॉलेज कळे, ता. पन्हाळा, जि. कोल्हापूर | स्कुटर मोटर सायकर दुरुस्ती | १ |
| | | | | बॅकिग | १ |
| | | | | स्मॉल इंडस्ट्रिज ॲण्ड सेल्फ एम्प्लॉयमेंट | १ |
| | | **२२** | इंचलकरंजी एज्युकेशन सोसायटीचे व्यंकटराव हायस्कूल ॲण्ड ज्युनियर कॉलेज, ५/५५, नारायण पेठ, इचलकरंजी, ता. हातकणगले, जि. कोल्हापूर | इलेक्ट्रॉनिक्स | १ |
| | | | | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| | | **२३** | श्री आचार्यरत्न देशभूषण शिक्षण प्रसारक मंडळ, कोल्हापूर संचलित महावीर महाविद्यालय, कोल्हापूर, बी. एम. रोटे कनिष्ठ महाविद्यालय, ७/ई, वैशाली परिसर, भाऊसिंगजी रोड, कोल्हापूर, जि. कोल्हापूर | इलेक्ट्रॉनिक्स | १ |
| **नाशिक** | **नाशिक** | **२४** | जगदंबा एज्युकेशन सोसायटी, येवला व्दारा संचलित संतोष श्रमिक माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालय, बाभुळगाव, पो. भाटगाव, ता. येवला, जि. नाशिक | इलेक्ट्रीकल मेटेनन्स | १ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **नाशिक नाशिक** | **जळगांव** | **२५** | ईस्ट खान्देश एज्युकशेन सोसायटी जळगाव, संचलित रावसाहेब रुपचंद कनिष्ठ महाविद्यालय, जळगाव, जि. पेठ, जि. जळगाव | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| | | **२६** | लेवा एज्यूकेशनल युनियन जळगांव संचलित डॉ. अण्णासाहेब जी. डी. बेंडाळे, महिला कनिष्ठ महाविद्यालय, जळगाव, जि. जळगाव | इलेक्ट्रॉनिक्स | १ |
| | **अहमद नगर** | **२७** | अहमदनगर एज्युकेशन सोसायटीचे रुपीबाई मोतीलालजी बोरा न्यु. इंग्लिश स्कूल आणि ज्युनियर कॉलेज, विश्रामबाग, अहमदनगर, जि. अहमदनगर | इलेक्ट्रॉनिक्स | १ |
| | | | | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| | | **२८** | महाराष्ट्र तांत्रिक शिक्षण मंडळ, अहमदनगर, डॉ. बडे हॉस्पीटल बिल्डिंग, हॉटेल ओबेरॉय समोर सावेडी रोड, अहमदनगर, जि. अहमदनगर | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| | | **२९** | जनता शिक्षण प्रसारक मंडळाचे काकासाहेब म्हस्के माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालय, बोल्हेगाव फाटा, नागापूर, जि. अहमदनगर | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| | | **३०** | बाबुराव बापुजी तनपुरे ग्रामीण शिक्षण संस्थेचे सौ. भागीरथी बाई तनपुरे कन्या माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालय राहूरी, ता. राहुरी, जि. अहमदनगर | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| **अमरावती** | **बुलढाणा** | **३१** | चाणक्य बहुउद्देशिय संस्था, सुंदरखेड व्दारा संचलित सरस्वती माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालय, सुंदरखेड, ता. जि. बुलढाणा | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| | | **३२** | सातपूडा शिक्षण व ग्रामीण विकास संस्था पळशी वैद्य ता.जळगांव, जामोद, जि.बुलढाणा संचलित बापूमियॉ सिराजोदिन पटेल कला व विज्ञान कनिष्ठ महाविद्यालय, पिंपळगांव काळे, ता.जळगांव, जामोद, जि.बुलढाणा | कॉम्प्युटर सायन्स | १ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अमरावती** | **बुलढाणा** | **३३** | अमृत सेवाभावी संस्था, परभणी व्दारा संचलित कै. कु. दुर्गा कनिष्ठ बनमेरु कनिष्ठ विज्ञान महाविद्यालय, लोणी रोड, लोणार, जि. बुलढाणा | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| | | **३४** | श्री ज्ञानेश्वर समाजप्रबोधन संस्था,पेठ, ता. चिखली, जि. बुलढाणा व्दारा संचलित, ज्ञानेश्वर कनिष्ठ कला व विज्ञान महाविद्यालय, पेठ, ता. चिखली, जि. बुलढाणा | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| | **अकोला** | **३५** | पंचशिल टिचर्स एज्युकेशन सोसायटी व्दारा संचलित, विज्ञान कनिष्ठ महाविद्यालय,बाळापूर, जि. अकोला | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| | | **३६** | श्री. त्र्यंबकराव डवले बहुउद्देशिय शिक्षण प्रसारक संस्था, अकोला व्दारा संचलित श्री डवले कनिष्ठ महाविद्यालय मोठी उमरी,अकोला, जि. अकोला | फ्रेश वॉटर फीश कल्चर | १ |
| | | **३७** | महाराष्ट्र इन्स्टिटयुट ऑफ रुरल डेव्हलपमेंट, अकोला व्दारा संचलित नॅशनल कनिष्ठ महाविद्यालय, न्यु तापडीया नगर, अकोला, जि. अकोला | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| | | **३८** | श्री छत्रपती शाहू शिक्षण संस्था, अकोट, जि. अकोला व्दारा संचलित अकोट कृषी विद्यालय व कनिष्ठ महाविद्यालय, अकोट, जि. अकोला | इलेक्ट्रीकल मेटेनन्स | १ |
| | | **३९** | सतीमाता शैक्षणिक बहुउद्देशिय क्रिडा मंडळ, व्दारा संचलित मनोहर नाईक कनिष्ठ महाविद्यालय, महान, ता. बार्शिटाकळी, जि. अकोला | फ्रेश वॉटर फीश कल्चर | १ |
| | **यवतमाळ** | **४०** | मातोश्री बागीबाई राठोड ग्रामिण विकास व शिक्षण संस्था किन्ही व्दारा संचलित राजीव गांधी कला व वाणिज्य महाविद्यालय, ईस्तारी नगर, घाटंजी, जि. यवतमाळ | स्मॉल इंडस्ट्रिज अॅण्ड सेल्फ एम्प्लॉयमेंट | १ |
| | | | | ऑफिस मॅनेजमेंट | १ |
| | | **४१** | जगदंबा बहुउद्देशिय ग्रामिण विकास संस्था, जगदंबा कनिष्ठ महाविद्यालय (विज्ञान) यवतमाळ शिंदे प्लॉट, यवतमाळ, जि. यवतमाळ | इलेक्ट्रॉनिक्स | १ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अमरावती** | **यवतमाळ** | **४२** | साईप्रेम ग्रामिण विकास संस्था, २१, वर्धमान नगर, दारव्हा रोड, यवतमाळ संचलित श्रीमती अनिताताई नाईक उच्च माध्यमिक विद्यालय, वाघापूर, ता. जि. यवतमाळ | स्कुटर मोटर सायकर दुरुस्ती | १ |
| | | | | बॅकिग | १ |
| **नागपूर** | **चंद्रपूर** | **४३** | मुरलीधर बागला कॉन्वेट बागला नगर चंद्रपुर व्दारा संचलित मुरलीधर बांगला कनिष्ठ महाविद्यालय बागलाण नगर बाबु पेठ चंद्रपूर , जि. चंद्रपूर | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| | | **४४** | इंडियन सोसायटी फॉर सोशल डेव्हलपमेंट्, चंद्रपूर व्दारा संचलित, जयंहिद ज्युनिअर कॉलेज ऑफ सायन्स, तुकूम, चंद्रपूर, जि. चंद्रपूर | इलेक्टॉनिक्स | १ |
| **नागपूर** | **चंद्रपूर** | **४५** | डॉ. बाबासाहेब आंबेडकर शिक्षण संस्था चंद्रपूर ( ब्रम्हगिरी ) व्दारा संचलित डॉ. आंबेडकर कनिष्ठ महाविद्यालय ब्रम्हगिरी, जि. चंद्रपूर | फ्रेश वॉटर फिश क्ल्चर | १ |
| | | **४६** | डॉ. बाबासाहेब आंबेडकर मेमोरीयल सोसायटी चंद्रपूर व्दारा संचलित डॉ. आंबेडकर कला वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, चंद्रपूर, जि. चंद्रपूर | इलेक्ट्रॉनिक्स | १ |
| | **वर्धा** | **४७** | संत सखुबाई शिक्षण संस्था, बॅक कॉलनी दुर्गानगर मानेवाडा रोड नागपूर, व्दारा संचलित नेताजी सुभाष चंद्र बोस ज्युनिअर कॉलेज वासी, ता. समद्रपूर जि. वर्धा | मार्केटिंग ॲण्ड सेल्समनशिप | १ |
| | | **४८** | सोसायटी ऑफ सिस्टरर्स ऑफ सेंट जॉन वर्धा व्दारा संचलित, सेंट जॉन्स ज्युनिअर कॉलेज ऑफ सायन्स, हिंगणघाट, जि. वर्धा | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| | **गोंदिया** | **४९** | युनायटेड एज्युकेशन सोसायटी, बोंडगांव/ देवी ता. अर्जुनी /मोर. जि. गोंदिया व्दारा संचलित मानवका कनिष्ठ कला व विज्ञान महाविद्यालय बोंडगांव/ देवी ता. अर्जुनी/मोर, जि. गोंदिया. | क्रॉप सायन्स | १ |
| | **एकूण** | | | | **६१** |